**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१६-२०१७**
**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीवेतनाची वर्गणी म्हणून प्राधिकरणास सहायक अनुदान (२२१५ १६३८) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१७/प्र.क्र.७६/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ९ मार्च, २०१७

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६**
२) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/निवेशा/वित्त-१/सुधारीत अंदाज/२०१६-१७/ ११३५, दि. ७ नोव्हेंबर, २०१६**
३) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/निवेशा/वित्त-१/अंदाजपत्रक/२०१७-१८/ ११८०, दि. ९ नोव्हेंबर, २०१६**
४) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.८ फेब्रुवारी, २०१७**

**प्रस्तावना :-**

शासनाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेले परिसर अभियांत्रिकी मंडळाचे सर्व कर्मचारी / अधिकारी सन १९७९ मध्ये महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनि:सारण मंडळ स्थापन झाल्यानंतर शासनाकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग करण्यात आले आहेत. सदर कर्मचा-यांच्या शासनाकडील सेवेच्या दायित्वासंबंधी निवृत्तीवेतन व निवृत्तीविषयक इतर लाभ अदा करण्यासाठी प्राधिकरणास २२१५ १६३८ या लेखाशिर्षाखाली शासनाकडून अनुदान देण्यात येते. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी सदर प्रयोजनार्थ रु. ४,५२,५८,०००/- ( अक्षरी रुपये चार कोटी बावन्न लाख अठ्ठावन्न हजार फक्त ) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाच्या वाचा मधील अनुक्रमांक २ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ९० % निधी संगणक प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. त्यास अनुसरुन लेखाशिर्ष २२१५१६३८ अंतर्गत ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये ४,०७,३२,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी सात लाख बत्तीस हजार दोनशे फक्त) इतका निधी अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध असून सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर शासकीय संस्थांना सहाय्य - (०१) इतर शासकीय संस्थांना सहाय्य (०१)(०३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीवेतनाची वर्गणी म्हणून प्राधिकरणास सहायक अनुदान (२२१५ १६३८) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रुपये ४,०७,३२,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी सात लाख बत्तीस हजार दोनशे फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वाचा मधील अनुक्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन रुपये ४,०७,३२,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी सात लाख बत्तीस हजार दोनशे फक्त) एवढी रोख रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सदस्य सचिवांना मंजूर करण्यास शासन या आदेशान्वये मान्यता देत आहे.

२. या आदेशान्वये मंजूर केलेली रक्कम रुपये ४,०७,३२,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी सात लाख बत्तीस हजार दोनशे फक्त) प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.सुधाकर डांगे यांचे सहीने तयार केलेले व उप सचिव, श्री.म.भ.सावंत, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करावे. संचालक (वित्त), श्री.सुधाकर डांगे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उप सचिव, श्री.म.भ.सावंत, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हे देयक प्रतिस्वाक्षरीत करण्यासाठी उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

४. मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ नुसार महालेखाकार, मुंबई यांच्याकडे त्यांच्या मागणीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रासह निरिक्षणाकरीता सादर करण्यात यावेत.

५. सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील निधी मागणी करताना सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना कर्मचारीनिहाय वितरित रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

६. महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) यांनी उक्त रक्कम "मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर शासकीय संस्थांना सहाय्य -- (०१) इतर शासकीय संस्थांना सहाय्य (०१)(०३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीवेतनाची वर्गणी म्हणून प्राधिकरणास सहायक अनुदान (२२१५१६३८) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून, सन २०१६-२०१७ मधील वित्तीय लेख्यात समाविष्ट करावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१६५४४४५६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.03.09 18:51:55 +05'30'

**(सतीश वि. कोवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१.मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन मुंबई.
२.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
३.मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४.मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे वि.का.अ.मंत्रालय,मुंबई.
५.मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
६.मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
७.अ.मु.स./प्र.स./सचिव,मंत्रालय,मुंबई.
८.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९.संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
११.महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
१२.महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१४.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१६.नियंत्रक अधिकारी सर्व,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.

१६.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१७.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४११)
१८.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१९.निवड नस्ती कार्यासन पापु-२३.